**शासकीय विज्ञान संस्था, नागपूर.**
स्थानिक सल्लागार समितीची स्थापना.

# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्रमांक : शाविसं **२००९ / प्र. क्र. २६० / मशि - २,**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**मंत्रालय ( विस्तार ), मुंबई - ४०० ०३२.**
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०११.

वाचा : १. महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४,
२. शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शाविसं २००२ / ( ५१७ / ०२ ) /मशि - १, दिनांक १५ मार्च, २००३.
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : उशिसं स्थासस / प्रशा ३, दिनांक ४ जुलै, २००९.

## शा स न नि र्ण य

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ च्या कलम ८५ ( २ ) अनुसार शासकीय विज्ञान संस्था, नागपूर यांच्या दिनांक १५ मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या स्थानिक सल्लागार समितीचा कालावधी दिनांक १४ मार्च, २००८ रोजी संपलेला आहे.

आता संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे दिनांक ४ जुलै, २००९ च्या प्रस्तावास अनुसरुन शासकीय विज्ञान संस्था, नागपूर यांचेसाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर, | मानद सदस्य |
| २ | संचालक, विज्ञान संस्था, नागपूर, | सदस्य सचिव |
| ३ | श्री. महेशकुमार यशवंतराव साळुंखे ( अधिव्याख्याता ), शिक्षक प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | श्री. मधुकर त्र्यंबक भारंबे ( अधिव्याख्याता ), शिक्षक प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | श्री. अशोक बळीराम कळंबे ( अधिव्याख्याता ), शिक्षक प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | श्री. किशोर निळकंठ ठाकरे ( भांडारपाल ), शिक्षकेतर प्रतिनिधी | सदस्य |
| ७ | श्री. रमेश भास्कर खानझोडे | अशासकीय सदस्य |
| ८ | डॉ. श्री. उदय गोविंदराव बोधनकर | अशासकीय सदस्य |
| ९ | डॉ. भा. ल. भालचंद्र | अशासकीय सदस्य |

सदर नमनिर्मित समिती या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अस्तित्त्वात येईल व तिचा कालावधी ५ वर्षांचा असेल. सदर समिती एका वर्षातून किमान २ बैठका घेईल.

सदर समितीचे अधिकार व कर्तव्ये महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८५ ( ५ ) अनुसार खालीलप्रमाणे असतील.

(क) अंदाजपत्रक व वित्तीय विवरणपत्रे तयार करणे ;

(ख) अध्यापकीय व इतर पदे निर्माण करण्यासाठी व्यवस्थापनाला शिफारस करणे ;

(ग) शिक्षणाचा कार्यक्रम ठरविणे व अंतर्गत मुल्यमापन करणे आणि महाविद्यालयातील अभ्यासाच्या प्रगतीविषयी चर्चा करणे ;

(घ) महाविद्यालयातील अध्यापनाचा दर्जा सुधारण्यासाठी व्यवस्थापनाकडे शिफारस करणे ;

(ङ) महाविद्यालयातील अर्थसंकल्पामध्ये तरतूद न केलेल्या अशा नवीन खर्चाचे प्रस्ताव तयार करणे ;

(च) निरनिराळ्या वर्गांची प्रवेशक्षमता, वेळापत्रके तयार करणे, अध्यापनाच्या उपलब्ध कार्यभाराचे वाटप करणे यासंबंधात आणि प्राचार्यांकडून तिच्याकडे विचारार्थ पाठविण्यात येतील त्या महाविद्यालयाचे अंतर्गत व्यवस्थापन व महाविद्यालयातील विद्यार्थ्यांची शिस्त त्यांच्याशी संबंधित अशा इतर बाबींविषयी प्राचार्यांना सल्ला देणे;

(छ) कोणताही निरीक्षण अहवाल असल्यास, त्यावर विचार करणे आणि त्यावर शिफारशी करणे ;

(ज) स्थानिक चौकशी समितीचा कोणताही अहवाल असल्यास त्यावर विचार करणे आणि त्यावर शिफारशी करणे ;

(झ) ३० जून रोजी संपणाऱ्या वर्षासाठी समितीने केलेल्या कामाचा वार्षिक अहवाल तयार करणे आणि तो व्यवस्थापनास, विद्यापीठाच्या व्यवस्थापन परिषदेस व संचालक यांना सादर करणे ;

(ञ) व्यवस्थापनाकडून व विद्यापीठाकडून सोपविण्यात येतील अशी इतर कर्तव्ये पार पाडणे व अशा इतर अधिकारांचा वापर करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर २०११०२२३१४२१४९००१ येथे उपलब्ध आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

**( रा. भा. गायकवाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सहसंचालक, उच्च शिक्षण, नागपूर विभाग, नागपूर,
संचालक, शासकीय विज्ञान संस्था, नागपूर,
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल ( लेखापरीक्षा ), महाराष्ट्र, नागपूर,
कोषागार अधिकारी, नागपूर,
समितीचे सदस्य ( संचालक, शासकीय विज्ञान संस्था, नागपूर यांचेमार्फत ),
कार्यासन अधिकारी, साशि १, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय,
निवड नस्ती.